**मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतिगृह, ठाणे,**
**जि. ठाणे इमारत भाडे मंजूरीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच -२०१४/ प्र.क्र.१३९/शिक्षण-२**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : १२ ऑगस्ट, २०१४.

<u>वाचा -</u>

**१) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र : सकआ/ शिक्षण/ शागृह/ मुलींचे- ठाणे / इ.भा मंजुरी/ प्र.क्र./ २०१३-१४/ का-५अ/ १३३५, दि.२६.०५.२०१४.**

**<u>शासन निर्णय-</u>**

अनुसूचित जाती मुला-मुलींसाठी शासकीय वसतिगृहे सुरु करण्याचा निर्णय राज्य शासनाकडून घेण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत अनुसूचित जाती मुलींसाठी ठाणे, जि. ठाणे येथे शासकीय वसतिगृह सुरु करण्यात आले असून सदर वसतिगृहासाठी मे.डी.डाहयाभाई आणि कंपनी प्रा.लि.मुंबई यांचे मालकीची कोठारी कंपाऊंड, चितळसर रोड, मानपाडा, ठाणे येथील एकूण ३१३५.६७ चौ.फूट क्षेत्रफळ असलेली इमारत शासनाने दि.१.०८.२००३ ते दि.३१.०७.२००८ व दि.१.०८.२००८ ते दि.३१.०७.२०१३ या कालावधीकरिता भाडेतत्वावर ताब्यात घेतली होती. या इमारतीचे भाडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे यांनी दि.१.०८.२००३ ते दि.३१.०७.२००८ या कालावधीकरिता दरमहा रु. ७८,३९२/-फक्त व दि.१.०८.२००८ ते दि.३१.०७.२०१३ या कालावधीकरिता रु. ९४,०७० /- फक्त सर्व कर वगळून प्रमाणित करुन दिले आहे.

२. या शासकीय वसतिगृहाकरिता घेतलेल्या इमारतीच्या भाडयाचा तपशिल खालील प्रमाणे आहे :-

| अ. क्र. | इमारत मालकाचेनाव | इमारत | ताबा घेतल्याचा दिनांक | प्रमाणित केलेले भाडे(दरमहा) | क्षेत्रफळ | मंजूर करावयाचे दरमहा एकूण भाडे व कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | मे.डी. डाहया भाई आणि कंपनी प्रा.लि.मुंबई | एकूण - ३१३५.६७ चौ.फूट | दिनांक १.०८.२००३ | **१.** दि.१.८.२००३ ते ३१.७.२००८ या कालावधी साठी दरमहा रु. ७८,३९२/- फक्त<br>**२.** दि.१.८.२००८ ते ३१.७.२०१३ या कालावधीसाठी दरमहा रु. ९४,०७०/- फक्त | ३१३५.६७ चौ.फूट | **दि.१.०८.२००३ ते दि. ३१.०७.२००८ साठी रू. ७८,३९२/- व दि. १.०८.२००८ ते दि. ३१.०७.२०१३ साठी रु. ९४,०७०/-** (सर्व कर वगळून) |

३. वरील प्रमाणे विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर विचार करुन मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतिगृह, ठाणे, जि. ठाणे या वसतिगृहासाठी मे. डी. डाहयाभाई आणि कंपनी प्रा.लि.मुंबई यांच्या मालकीच्या भाडयाने घेतलेल्या इमारतीचे भाडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे यांनी प्रमाणित केले आहे. त्यानुसार इमारत मालकाने केलेल्या कराराप्रमाणे परिच्छेद २ येथील तपशिलात नमूद केल्याप्रमाणे सदर वसतिगृहासाठी दि.१.०८.२००३ ते दि.३१.०७.२००८ या कालावधीकरिता दरमहा रु. ७८,३९२/-फक्त व दि.१.०८.२००८ ते दि.३१.०७.२०१३ या कालावधीकरिता रु. ९४,०७० /- फक्त (सर्व कर वगळून) इतके इमारत भाडे मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. मात्र सर्व कर इमारत मालकाने भरणे आवश्यक राहील.

४. गृहपाल, मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतिगृह, ठाणे, जि. ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासकीय वसतिगृहासाठी संपूर्ण भाड्याची रक्कम संबंधितास यापूर्वी अदा केली असेल तर स दर भाडे रक्कम समायोजित करण्याची कार्यवाही त्यांनी नियमानुसार करावी.

५. सदर इमारत मालकास भाडे अदा करताना आयकर विषयक असणाऱ्या "स्त्रोताच्या कपातीबाबत (Tax deducted at source) नियमानुसार योग्य ती कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

६. यावर होणारा खर्च हा अर्थसंकल्पित लेखाशिर्ष " सामाजिक न्याय विभाग , मागणी क्रमांक एन-३, २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण (०१) (०१), अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्याकरिता असलेल्या शासकीय वसतिगृहांचे परिरक्षण (२२२५ ०२८१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखाली केलेल्या सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १ ते ५, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि.१५ मे, २००९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४०८०८१५०२४५३९२२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2014.08.13 16:33:03 +05'30'

**डॉ.वसंत माने**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, कोकण विभाग.

३. सहायक आयुक्त, समाज कल्याण, ठाणे.

४. महालेखापाल, महाराष्ट्र -१ ( लेखा परिक्षा) / (लेखा अनुज्ञेयता ) /मुंबई .

५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

६. वित्त विभाग, (व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२.

७. मे. डी. डाहयाभाई आणि कंपनी प्रा.लि.मुंबई.

८. अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. निवड नस्ती.